**<u>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर निधीच्या विनियोगाबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-११९८/प्र.क्र.३०/नवि-०४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २६ फेब्रुवारी, २०२०

<u>संदर्भ :-</u>

**१.** शासन निर्णय, नगर विकास विभाग, समक्रमांक, दिनांक १२ मार्च,२०१८.
**२.** शासन निर्णय, नगर विकास विभाग,सम क्रमांक, दिनांक ४ जून,२०१८.
**३.** शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक ९ ऑगस्ट,२०१८.
**४.** शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक १५ डिसेंबर,२०१८.
**५.** शासन निर्णय, नगर विकास विभाग, सम क्रमांक, दिनांक १ जून,२०१९.

<u>प्रस्तावना</u> :-

नगर विकास विभागाकडून विविध योजनांतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या विनियोग विहित कालावधीत न केल्यामुळे अशा अखर्चित झालेल्या निधी संदर्भात करावयाच्या कार्यवाहीबाबतच्या सविस्तर सूचना व कालमर्यादा समक्रमांकाच्या संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१,२,३,४ व ५ अन्वये देण्यात आल्या आहेत.त्यामध्ये नमुद कालमर्यादेत सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**सन २०१५-२०१६ , सन २०१६-२०१७ व सन २०१७-२०१८** या आर्थिक वर्षामध्ये वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने ज्या प्रकरणामध्ये कार्यारंभ आदेश देवून कामे सुरू झाली असतील अशा प्रकरणी कामे पूर्ण करून निधी खर्च करण्यास दिनांक **३१ मे,२०२०** पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**०२.** २०१४-१५ व त्यापुर्वीच्या वर्षात राज्यातील महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना नगर विकास विभागामार्फत वितरीत करण्यात आलेल्या व अद्याप अखर्चित असलेल्या निधी तात्काळ शासनास जमा करण्यात यावा.

**०३.** संदर्भ क्र.१,२,३,४ व ५ येथील शासन निर्णयान्वये यापुर्वीच शासन जमा करण्यात आलेल्या निधीबाबत सदर आदेश लागु राहणार नाहीत.

**०४.** सदर निधी विहित मुदतीत खर्च करण्याची संयुक्त जबाबदारी संबधीत जिल्हाधिकारी, संबधीत आयुक्त/मुख्याधिकारी व संबधीत महापौर/नगराध्यक्ष यांची राहील.

**०५.** दिनांक ३१ मे,२०२० अखेर खर्च न होणारा निधी तात्काळ शासन जमा करण्याची संयुक्त जबाबदारी संबधीत जिल्हाधिकारी, संबधीत आयुक्त/मुख्याधिकारी व संबधीत महापौर/नगराध्यक्ष यांची राहील.

**०६.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२६१२४१४८६३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vivek Shankar Kumbhar

Digitally signed by Vivek Shankar Kumbhar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ef935067970760fbaec2fa421af2eac23d3b8737b990883be0d8ef292ba28a2f, serialNumber=5e3716fd0fe61ee87305882bc35ee7e757293849e74351e2ab33e4eb40bfb646, cn=Vivek Shankar Kumbhar
Date: 2020.02.27 11:55:19 +05'30'

**( विवेक कुंभार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

१. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, मुंबई.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.सर्व उपप्रादेशिक संचालक नगर परिषद प्रशासन
१५.अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई
१६.आयुक्त, सर्व महानगरपालिका
१७.सर्व जिल्हा प्रशासन अधिकारी
१८.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९.मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
२०.मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
२१.निवडनस्ती, (नवि-०४)